निवडसुची वर्ष २०२४-२५ मध्ये उप जिल्हाधिकारी (निवडश्रेणी) संवर्गातील पात्र अधिकाऱ्यांना अपर जिल्हाधिकारी संवर्गातील नियमित पदोन्नती कोटयातील रिक्त पदांवर निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती व पदस्थापना देणेबाबत.......

# महाराष्ट्र शासन

**महसूल व वन विभाग**

**शासन आदेश क्र. पदस्था-२०२५/प्र.क्र.११२/ई-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक- २१ मे, २०२५.

**संदर्भ :-**

१. शासन परिपत्रक, महसूल व वन विभाग क्र.एसएनटी-२०२०/प्र.क्र.९७/ई-१ अ, दि. ३१.१२.२०२०
२. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.बीसीसी २०१८/प्र.क्र.३६६/१६-ब, दि.०७.०५.२०२१
३. शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरव्ही-२०१६/प्र.क्र.२८१/ बारा, दि. २१.०६.२०२१
४. शासन परिपत्रक, महसूल व वन विभाग क्र.एसएनटी-२०१७/प्र.क्र.२१/ई-१ अ, दि.०५.०७.२०२१
५. शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरव्ही-२०२०/प्र.क्र.४९/ कार्या.१२, दि. १४.०७.२०२१
६. शासन परिपत्रक, महसूल व वन विभाग क्र.ज्येसूची-२०२४/प्र.क्र.६१/ई-१ अ, दि. ०३.०१.२०२५
७. सह सचिव, सामान्य प्रशासन विभाग यांचे पत्र क्र. ईएसबी-११२५/प्रक्र १६/आस्थामं (का-१३), दिनांक १५.०४.२०२५.
८. शासन निर्णय, समक्रमांक, दिनांक २२.०४.२०२५.

**शासन आदेश** :-

सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक ७ येथील दिनांक १५.०४.२०२५ रोजीच्या इतिवृत्तान्वये, आस्थापना मंडळ (क्रमांक २) यांनी उप जिल्हाधिकारी (निवडश्रेणी) संवर्गातील पात्र अधिका-यांची अपर जिल्हाधिकारी या पदोन्नतीच्या पदाकरीता पात्रता तपासून निवडसूची वर्ष २०२४-२०२५ मध्ये उप जिल्हाधिकारी (निवडश्रेणी) (वेतनश्रेणी एस २३-₹ ६७,७००-२,०८,७००/-) या संवर्गातील पात्र अधिकाऱ्यांना अपर जिल्हाधिकारी (गट-अ) (वेतनश्रेणी एस २५-₹७८,८००-२,०९,९००/) या संवर्गात नियमित पदोन्नती कोटयातील रिक्त पदांवर निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देण्याबाबत शिफारस करण्यात आलेली आहे.

२. शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरव्ही-२०२०/प्र.क्र.४९/कार्या.१२, दि.१४ जुलै, २०२१ अन्वये "महाराष्ट्र शासकीय गट-अ व गट-ब (राजपत्रित व अराजपत्रित) पदांवर सरळसेवेने व पदोन्नतीने नियुक्तीसाठी महसूल विभाग वाटप नियम, २०२१" निर्गमित झाली असून सदर अधिसूचनेतील परिच्छेद क्र.२(२)(ग) अन्वये अतिरिक्त जिल्हाधिकारी व अतिरिक्त जिल्हाधिकारी (निवड श्रेणी) या संवर्गाला महसूली संवर्ग वाटप नियमावली लागू होत नाही.

३. सबब, आस्थापना मंडळाच्या शिफारशींनुसार व महसुल संवर्ग वाटप नियमावलीमधील परिच्छेद क्र. २(२)(ग) नुसार, **संदर्भ क्र. ८ येथील दिनांक २२.०४.२०२५ रोजीच्या शासन आदेशामध्ये अंशत: सुधारणा करुन**, पुढील अधिकाऱ्यांना प्रशासकीय निकड म्हणून सार्वजनिक सेवेच्या / लोकहितास्तव सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेनंतर त्यांच्या नावासमोर दर्शविल्याप्रमाणे, अपर जिल्हाधिकारी (गट-अ) (वेतनश्रेणी एस २५-₹७८,८००-२,०९,९००/) या पदावर पदोन्नती कोटयातील रिक्त पदांवर निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात प्रथमत: ३ वर्षाकरिता प्रतिनियुक्तीने नियुक्ती देण्यात येत आहे. :-

| **अ.क्र.** | **अपर जिल्हाधिकारी या पदावर पदोन्नत अधिका-याचे नाव** | **अपर जिल्हाधिकारी या पदावर पदोन्नतीनंतरची पदस्थापना** |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १ | श्रीमती शुभांगी अनिल साठे | संदर्भ क्र. ८ येथील दिनांक २२.०४.२०२५ च्या शासन आदेशामध्ये अंशत: सुधारणा करुन, अपर जिल्हाधिकारी, सिंधुदुर्ग या श्री.रवि जनार्दन पाटील यांच्या बदलीने रिक्त होणा-या पदावर |

४. संदर्भ क्र. ८ येथील शासन आदेशात नमूद इतर अटी व शर्ती कायम राहतील.

५. उपरोक्त अधिकारी यांनी पदस्थापना देण्यात आलेल्या ठिकाणी तात्काळ रुजू व्हावे व नवीन नियुक्तीच्या पदावर रुजू झालेबाबतचा अहवाल e1.revenue@maharashtra.gov.in यावर ई-मेलद्वारे /टपालाद्वारे कळवावे.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२५०५२११७०९५८०२१९ असा आहे. सदर शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VARUDKAR MAHESH ASHOKRAO

Digitally signed by VARUDKAR MAHESH ASHOKRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=Revenue and Forest Department, 2.5.4.20=d93c4961d98086877a4048296211d7af97ecfd40d7967c43d20b360d83ce0fa6, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7ebbbc3712e8d459ef90bf7aae4ea46e9caebdd50cfecde2ee7ce0454fa0416a, cn=VARUDKAR MAHESH ASHOKRAO
Date: 2025.05.21 17:10:50 +05'30'

**(महेश वरुडकर)**
**शासनाचे उप सचिव**

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई ३२
२. मा.उप मुख्यमंत्री (नगरविकास/गृहनिर्माण) महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई ३२

३. मा.उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन) महोदयांचे सचिव, मंत्रालय, मुंबई ३२
४. मा. मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ३२
५. मा. राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ३२
६. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन यांचे उप सचिव, मंत्रालय, मुंबई ३२
७. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
८. विभागीय आयुक्त, कोकण
९. जिल्हाधिकारी, सिंधुदुर्ग
१०. अपर मुख्य सचिव (महसूल) यांचे विशेष कार्य अधिकारी, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
११. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२ मुंबई.
१२. अधिदान व लेखा अधिकारी/निवासी लेखा अधिकारी, सिंधुदुर्ग
१३. जिल्हा कोषागार अधिकारी, सिंधुदुर्ग
१४. संबंधित अपर जिल्हाधिकारी (विभागीय आयुक्तांमार्फत)
१५. सह सचिव (कार्यासन १३), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय,मुंबई
१६. सह सचिव( कार्यासन १४ )सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय,मुंबई ३२
१७. सह सचिव( ल-७ )/(ई शाखा ) महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई ३२
१८. उप सचिव (ई-१), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९. नियंत्रक अधिकारी/ आहरण व संवितरण अधिकारी, महसूल व वन विभाग,मंत्रालय, मुंबई ३२
२०. निवड नस्ती (कार्यासन ई-१), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.